**२००४-२००५ ची जिल्हा वार्षिक**
**<u>विशेष घटक योजना तयार करणे.</u>**
**मार्गदर्शक तत्वे**

## महाराष्ट्र शासन

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
परिपत्रक क्रमांक: विघयो-२००३/प्र.क्र.६७/विघयो-१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १९ जुलै,२००३.

वाचा : नियोजन विभाग परिपत्रक क्रमांक:जिवायो-१००३/प्र.क्र.६५/का-१४४४,
दिनांक : २७ जून २००३.

**परिपत्रक**

सन २००४-२००५ च्या जिल्हा वार्षिक योजनांचे प्रारुप आराखडे तयार करण्यासाठी संदर्भाधिन परिपत्रकान्वये सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समित्या यांना सूचना देण्यात आल्या आहेत. विशेष घटक योजना तयार करणे व त्याचे सनियंत्रण करणे हे काम स्थायी स्वरुपात सामाजिक न्याय विभागाकडे सोपविण्यात आले आहे. त्यास अनुसरुन आणि संदर्भाधिन परिपत्रकातील परिच्छेद क्र. ४.२ अन्वये, जिल्हा वार्षिक विशेष घटक योजना २००४-२००५ चे प्रारुप आराखडे तयार करण्यासाठी या विभागातर्फे खालील प्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

२. सन २००४-२००५ ची **"विशेष घटक योजना"** तयार करण्यासाठी जिल्हावार कमाल आर्थिक मर्यादा (सिलिंग्ज) सोबतच्या जोडपत्र-१ मध्ये दिल्या आहेत.

३. सन २००४-२००५ ची जिल्हा वार्षिक विशेष घटक योजना तयार करण्याचे वेळापत्रक खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | कार्यवाही पूर्ण करावयाचा दिनांक | कार्यवाहीचा टप्पा पूर्णकरणे |
|---|---|---|
| १ | २१.७.२००३ | प्रशासकीय विभाग / विभाग प्रमुख / मंडळे /उपक्रम यांनी जिल्हास्तरीय अधिकाऱ्यांना त्यांच्याशी संबंधित विकासक्षेत्रातील जिल्हास्तरीय विशेष घटक योजना तयार करण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करणे. |

| | | |
|---|---|---|
| २ | २८.७.२००३ | जिल्हास्तरावरील तसेच इतर अंमलबजावणी अधिकारी यांनी जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समित्या, विभाग प्रमुख व प्रशासकीय विभाग यांच्याकडे विशेष घटक योजनांचे प्रस्ताव पाठविणे. |
| ३ | ४.८.२००३ | प्राप्त झालेल्या प्रस्तावांची / योजनांची जिल्हा नियोजन समितीच्या लहान गटाने छाननी करुन विशेष घटक योजनेचे प्रारुप तयार करणे |
| ४ | २०.८.२००३ | नियोजन विभागातील अधिकाऱ्यांनी, जिल्हा नियोजन समितीने तयार केलेल्या प्रारुपाची छाननी करणे |
| ५ | ४.९.२००३ | जिल्हा नियोजन समित्यांनी विशेष घटक योजनेच्या प्रारुपास मान्यता देणे |
| ६ | १२.९.२००३ | जिल्हाधिकारी कार्यालयाने नियोजन विभाग /सामाजिक न्याय विभाग/ विभाग प्रमुख / प्रशासकीय विभाग यांचेकडे जिल्हा योजनांचा प्रारुप आराखडा पाठविणे |
| ७ | १९.९.२००३ | सामाजिक न्याय विभागाने प्राप्त झालेल्या प्रारुप योजनेची छाननी करणे |
| ८ | २९.९.२००३ ते १०.१०.२००३ | मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय बैठकीत जिल्हा नियोजन समितीच्या प्रतिनिधींबरोबर जिल्हानिहाय चर्चा करुन जिल्हा विशेष घटक योजनेस अंतिम स्वरुप देणे |
| ९ | २०.१०.२००३ | नियोजन विभागामार्फत विशेष घटक योजनेचा एकूण राज्याच्या वार्षिक योजनेत समावेश करणे |

४. जिल्हयाची वार्षिक विशेष घटक योजना तयार करताना परिशिष्ट-१ मधील सूचना विचारात घ्याव्यात.

५. जिल्हा वार्षिक विशेष घटक योजनेत प्रस्तावित केलेल्या नियतव्ययाची विकासक्षेत्र/उपक्षेत्र योजना प्रकल्पनिहाय तालुकावार विगत जिल्हा नियोजन समितीच्या सदस्यांना बैठकीपूर्वी उपलब्ध करुन देण्यात यावी.

६. सन २००४-२००५ च्या जिल्हा वार्षिक योजनेस अंतिम स्वरुप देण्यासाठी प्रत्येक जिल्हयाची आवश्यक असलेली माहिती विहित प्रपत्रामध्ये प्राप्त व्हावी म्हणून १ ते ९ विवरणपत्रे विहित केलेली आहेत. त्यामध्ये माहिती संकलित करुन ती नियोजन विभागातील अधिका-यांच्या जिल्हा भेटीच्या वेळी तयार ठेवण्यात यावी.

७. जिल्हयाच्या प्रारुप योजनांवर राज्यस्तरावर जिल्हानिहाय चर्चा केल्यानंतर तयार झालेल्या जिल्हयाच्या आराखडयांचा राज्याच्या एकूण योजनेत अंतर्भाव करुन राज्याची एकूण योजना केंद्र

शासनाकडे पाठविण्यासाठी वर दिलेल्या वेळापत्रकाचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव यांना अशी विनंती आहे की, त्यांनी स्वतः आराखडे तयार करण्याच्या या कार्यवाहीवर लक्ष ठेवावे व जिल्हा नियोजन समित्यांनी संमत केलेल्या जिल्हा विशेष घटक प्रारुप योजनेच्या प्रस्तावाच्या १५ प्रती सोबतच्या सर्व विवरणपत्रातील माहितीसह सामाजिक न्याय विभागाकडे दिनांक १२/९/२००३ पर्यंत निश्चितपणे पाठविल्या जातील याची खात्री करावी, तसेच संबंधित मंत्रालयीन विभागांनासुध्दा त्याचवेळी प्रस्तावाची प्रत प्रत्यक्ष देण्याची व्यवस्था करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ना. ना. भडीकर )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

सहपत्रेः- १) जोडपत्र-१
२) परिशिष्ट-१
३) विवरणपत्रे १ ते ९

प्रति,
सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव,
जिल्हा नियोजन समित्या

प्रत सादर अग्रेषितः-

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ यांचे खाजगी सचिव.
शासनाचे मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सचिव, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,

सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ,
नवीन प्रशासकीय इमारत,१८वा मजला मुंबई,
सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ,नवीन प्रशासकीय इमारत,
जिल्हाधिकारी कार्यालय कम्पाऊंड, तळमजला, औरंगाबाद,
सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ,बी-२३/१,साऊथ अंबाझरी मार्ग,
अंध विद्यालयाजवळ, नागपूर,
नियोजन विभाग (का.१४४४), मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व समाजकल्याण अधिकारी (जिल्हा परिषद),
सर्व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालये,
निवड नस्ती का. विघयो-१.

--------

(शा. परिपत्रक क्रमांक: विघयो-२००३/प्र.क्र.६७ /विघयो-१ ,दि.   जुलै, २००३ चे जोडपत्र)

जोडपत्र-१

२००४-२००५ ची जिल्हा **"विशेष घटक योजना"** तयार करण्यासाठी कमाल नियतव्यय मर्यादा.

(रुपये कोटीत)

| अनु.क्र. | जिल्हयाचे नाव | "विशेष घटक" जिल्हा योजनेसाठी नियतव्ययाची मर्यादा |
|---|---|---|
| १ | मुंबई शहर | ११.०४ |
| २ | मुंबई उपनगर | १९.२० |
| ३ | ठाणे | १२.७३ |
| ४ | रायगड | ३.७२ |
| ५ | रत्नागिरी | ५.३७ |
| ६ | सिंधुदुर्ग | १.९९ |
| ७ | नाशिक | १५.२७ |
| ८ | धुळे | ४.५३ |
| ९ | नंदूरबार | १.७३ |
| १० | जळगांव | १३.७९ |
| ११ | अहमदनगर | १९.५४ |
| १२ | पुणे | २९.४८ |
| १३ | सातारा | १०.८७ |
| १४ | सांगली | १२.९९ |
| १५ | सोलापूर | २३.२७ |
| १६ | कोल्हापूर | १७.८१ |
| १७ | बुलढाणा | १२.०१ |
| १८ | अकोला | ९.३५ |
| १९ | वाशीम | ८.०४ |
| २० | अमरावती | १७.९८ |
| २१ | यवतमाळ | १०.६२ |
| २२ | नागपूर | २८.९३ |
| २३ | वर्धा | ७.११ |
| २४ | भंडारा | ८.६७ |
| २५ | गोंदिया | ७.९५ |
| २६ | चंद्रपूर | १४.०० |
| २७ | गडचिरोली | ४.४८ |
| २८ | औरंगाबाद | १४.२६ |
| २९ | जालना | ८.२५ |
| ३० | बीड | ११.४२ |
| ३१ | परभणी | ७.९५ |
| ३२ | हिंगोली | ४.१९ |
| ३३ | नांदेड | १९.७५ |
| ३४ | उस्मानाबाद | ९.७७ |
| ३५ | लातूर | १४.९३ |
|  | **एकूण :** | **४२३.००** |

**परिशिष्ट-१**

(शासन परिपत्रक सामाजिक न्याय विभाग क्रमांक : विघयो-२००३/प्र.क्र.६७/विघयो-१ ,
दि. जुलै, २००३ चे सहपत्र)

जिल्हा वार्षिक विशेष घटक योजना २००४-२००५ विकास क्षेत्र/उपक्षेत्रनिहाय तरतूदी करताना विचारात घ्यावयाचे सर्वसाधारण मुद्दे.

१. जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याच्या प्रक्रियेत लोकप्रतिनिधींचा पूर्ण सहभाग असतो. अशा प्रतिनिधींकडून काही सूचना प्राप्त झाल्यास त्या जिल्हयाला दिलेल्या एकूण वित्तीय मर्यादेत जिल्हा वार्षिक योजना तयार करताना विचारात घ्याव्यात. याबाबतचा तपशील सोबत जोडलेल्या **विवरणपत्र - ८** मध्ये देण्यात यावा.

२. **रोजगार हमी योजना** :- रोजगार हमी योजनेकरिता सर्वसाधारणपणे जिल्हयातील मागील ३ वर्षाच्या सरासरी खर्चाच्या २५ टक्के तरतूद जिल्हा योजनेत करणे आवश्यक आहे. त्यानुसार रोजगार हमी योजनेसाठी सर्वसाधारण योजना, आदिवासी उपयोजना व विशेष घटक योजना यामध्ये कराव्या लागणा-या तरतूदींची माहिती नियोजन विभागाच्या रोजगार हमी कक्षाकडून यानंतर कळविली जाईल. त्याप्रमाणे जिल्हा नियोजन समितीने त्यांच्या आराखडयात तरतूदी कराव्यात.

३. **केंद्र पुरस्कृत योजनाः-** केंद्र पुरस्कृत कार्यक्रमासाठी राज्याच्या वार्षिक योजनेत राज्याच्या हिंस्सा म्हणून आवश्यक ती तरतूद करावी लागते. तेव्हा जिल्हा नियोजन समित्यांनी आपल्या वार्षिक योजना तयार करताना प्राथम्याने केंद्रपुरस्कृत योजना /कार्यक्रमासाठी पुरेशा तरतूदी कराव्यात. जेणेकरुन जास्तीत जास्त केंद्रीय अर्थसहाय्य राज्यास मिळेल, केंद्र पुरस्कृत योजनांसाठी केलेल्या तरतूदींची माहिती विवरणपत्र-६ मध्ये द्यावी.

४. **नक्षलग्रस्त भागासाठी तरतूद**:- नक्षलग्रस्त भागाच्या विकासासाठी ज्या योजना कार्यान्वीत आहेत अशा योजनांसाठी प्राथम्याने तरतूद करावी.

५. सन २००२-२००३ या मागील आर्थिक वर्षात विशेष घटक योजनेचा आढावा घेण्यात आला आहे. त्याअनुषंगाने सर्वसाधारण स्वरुपाच्या योजना विशेष घटक योजनेतून घेण्यात येऊ नयेत अशा सूचना या विभागामार्फत संबंधित प्रशासकीय विभाग व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, यांना, वेळोवेळी निर्गमित करण्यात आल्या आहेत. याबाबतचा तपशिल खालील प्रमाणे आहे.

| अ. क्र. | निर्णय /पत्र क्र. व दिनांक | विषय / योजना | सूचना/अभिप्राय |
|---|---|---|---|
| १ | शासन पत्र क्र. विघयो-२००१/ प्र.क्र.५/विघयो-१, दि.१२.८.२००२ | ग्रामीण पत पुरवठा प्रकल्प | महाराष्ट्र ग्रामीण पतपुरवठा प्रकल्पासाठी निधी राखून ठेवू नये. |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | पत्र क्र. विघयो-२००२/ प्र.क्र.७३/ विघयो-१, दि.२३.१०.२००२ | विद्युत विकास | अनु. जाती व नवबौध्दांना घरगुती विद्युत जोडणी व कृषि पंपाचे विद्युतीकरण या दोनच योजनांकरीता नियतव्यय ठेवण्यात यावा. अन्य सर्वसाधारण स्वरुपाच्या योजनांना नियतव्यय ठेवण्यात येऊ नये. |
| ३ | पत्र क्र.विघयो-२००२/प्र.क्र.७८/ विघयो-१, दि.८.११.२००२ | पशुसंवर्धन | जनावरांच्या गटाचा पुरवठा, शेळी मेंढी गटाचा पुरवठा, जनावरांना खाद्यपुरवठा, प्रशिक्षण व विक्री इत्यादी योजनांची एक सर्वसमावेशक एकात्मिक पशुधन योजना तयार करणे |
| ४ | पत्र क्र.विघयो-२००२/ प्र.क्र.७८/ विघयो-१, दि.८.११.२००२ | मृद संधारण / जलसंधारण लघुपाटबंधारे, | मृद संधारण व लघुपाटबंधारे शिर्षाखालील योजनांसाठी विशेष घटक योजनेमधून तरतूद ठेऊ नये |
| ५ | पत्र क्र.विघयो-२००२/प्र.क्र.७८ / विघयो-१, दि.८.११.२००२ | नागरी दलित वस्ती सुधारणा | सार्वजनिक उपयोगासाठी मुताऱ्या/ शौचालये/ बालवाडी/बगीचे/ग्रंथालय/ सांस्कृतिक केंद्र/ दुकाने या प्रकारची सर्व साधारण स्वरुपाची कामे सदर योजनेतून करु नयेत. तसेच मागासवर्गीयांसाठी आरक्षित असलेल्या वार्डापुरती सदर योजना न राबविता ज्या ठिकाणी अनु. जाती व नवबौध्दाची संख्या ८०/. किंवा त्यापेक्षा जास्त आहे अशा दलित वस्त्यातच राबवावी. |
| ६ | पत्र क्र.विघयो-२००२/प्र.क्र.७८/ विघयो-१, दि.८.११.२००२ | महिला व बाल कल्याण | विशेष घटक योजनेमधून महिला व बाल कल्याण विभागामार्फत बऱ्याच योजनांसाठी किरकोळ स्वरुपात तरतूद ठेवली जाते. या योजनांमुळे महिलांचे पुनर्वसन होण्यास / दारिद्रय रेषेच्यावर येण्यास मदत होत नाही. त्यामुळे विशेष घटक योजनेतून फक्त महिला व बाल कल्याण समिती आणि पोषण आहार या योजनांकरीता नियतव्यय ठेवण्यात यावा. अन्य योजनांकरीता नियतव्यय ठेवू नये. |
| ७ | शासन निर्णय क्र.विघयो-२००१/ प्र.क्र.१३५/विघयो-१, दि.१३.११.२००२ | दलित वस्त्यांना जोडणारे जोडरस्ते | सन २००३ या वर्षापासून या शिर्षावर जिल्हा नियोजन मध्ये विशेष घटक योजनेमधून तरतूद करण्यात येऊ नये. |
| ८ | पत्र क्र.विघयो-२००२/ प्र.क्र.७०/ विघयो-१, दि.२९.४.२००३ | महिला सक्षमीकरण योजना | विशेष घटक योजनेमधील नियतव्ययामधील आवश्यक तेवढा नियतव्यय महिला सक्षमीकरण योजनेकरीता उपलब्ध करावा |

६. चालू असलेल्या योजना पूर्ण करुन त्याचे लाभ जिल्हयाला उपलब्ध करून देण्यासाठी ग्रामीण पाणीपुरवठा इ. उपक्षेत्रातील अपूर्ण कामे/योजना तसेच जे प्रकल्प पूर्ण होण्याच्या टप्यात आले आहेत असे प्रकल्प आणि चालू योजनांचा अपरिहार्य विस्तार यासाठी प्राथम्याने व पुरेशा तरतूदी करण्यात याव्यात.

७. विदर्भ, मराठवाडा व कोकण या विभागाच्या जलद विकासासाठी कालबध्द कार्यक्रमापैकी जिल्हास्तरीय योजनांसाठी आवश्यक ती तरतूद प्राथम्याने करावी व त्याची माहिती विवरणपत्र-९ मध्ये दर्शविण्यात यावी.

८. ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता या विकास क्षेत्राखालील नळाने पाणीपुरवठा (खास उपाय) ही योजनासुध्दा जिल्हा परिषदा व महाराष्ट्र जीवन प्राधिकरण या दोघांकडून राबविली जाते म्हणून या योजनेची तरतूद सुचविताना पुढीलप्रमाणे त्याची विगत द्यावीः-

| नळाने पाणी पुरवठा (खास उपाय) | तरतूद (रु. लाखात) |
|---|---|
| १. महाराष्ट्र पाणीपुरवठा व जलनिःसारण मंडळातर्फे राबविण्याचा कार्यक्रम | |
| २. जिल्हा परिषदेमार्फत राबविण्याचा कार्यक्रम | |
| | एकूण : |

तथापि ग्रामीण पाणीपुरवठयाचा बाहय सहाय्यित प्रकल्प तसेच नागरी पाणीपुरवठा या स्टेटपूल योजना असल्यामुळे त्या योजनांना जिल्हा योजनेत नियतव्यय ठेवण्यात येवू नये.

९. नवीन योजना किंवा बांधकामे घेण्यापूर्वी किंवा योजनेत कामे समाविष्ट करण्यापूर्वी अशा कामांच्या प्राथमिकता पूर्ण झाल्या आहेत व प्रस्तावित नियतव्यय खर्च होईल हे निश्चत झाल्यानंतरच ती कामे विचारात घ्यावीत. अन्यथा अशा कामावरील प्रस्तावित नियतव्यय व्यपगत होईल.

१०. प्रशासकीय विभागाकडून आणि विभाग प्रमुखांकडून २००४-२००५ च्या जिल्हा वार्षिक योजनेत अंतर्भूत करण्यासाठी त्यांच्या कार्यक्रमासंबंधीचे प्रस्ताव/सूचना अग्रक्रम प्राप्त होतील त्याचाही जिल्हा योजना तयार करताना यथोचित विचार करावा.

११. प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण, उच्च शिक्षण, औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील उपकरणांचे आधुनिकीकरण, जागतिक बँक सहायित कार्यक्रम, व्यावसायिक शिक्षण, इ. योजनांकरिता शिक्षण विभागाने कळविल्याप्रमाणे प्राथम्याने पुरेशी तरतूद करण्याचा प्रयत्न करावा.

१२. २००४-२००५ च्या जिल्हा वार्षिक योजनेचे आराखडे विचारात घेण्यासाठी एकूण ९ विवरणपत्रे विहित करुन सोबत जोडली असून ती सर्व माहिती सामाजिक न्याय / नियोजन विभागातील अधिकारी, योजनेच्या प्रारुपावर चर्चा करण्यासाठी जिल्हयात येतील त्यावेळी उपलब्ध असणे आवश्यक आहे. -------

**विवरणपत्र-१**

**प्रारुप वार्षिक विशेष घटक योजना २००४-२००५ च्या प्रस्तावित नियतव्ययाचा गोषवारा**

जिल्हा :-

(रुपये लाखात)

| अ.क्र. | क्षेत्र/उपक्षेत्र | २००३-२००४ | | २००४-२००५ | |
|---|---|---|---|---|---|
| | | मंजूर नियतव्यय | अपेक्षित खर्च | प्रस्तावित नियतव्यय | त्यापैकी भांडवली खर्च |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | पीक संवर्धन | | | | |
| २ | फलोत्पादन | | | | |
| ३ | | | | | |
| ४ | | | | | |
| एकूण | | | | | |

टीपः- १) वरील स्तंभ २ मध्ये उपक्षेत्रे घ्यावीत.

२) २००३-२००४ चा मंजूर नियतव्यय नियोजन विभागाने मे, २००३ मध्ये काढलेल्या जिल्हा वार्षिक योजनेच्या पुस्तकात दर्शविल्याप्रमाणे असावा.

३) स्तंभ ५ ची एकूण बेरीज जोडपत्र १ मध्ये जिल्हयास दिलेल्या सिलिंग इतकी असावी.

## विवरणपत्र-२

प्रारुप वार्षिक विशेष घटक योजना २००४-२००५ च्या विकास क्षेत्रामधील योजना/प्रकल्प यासाठी प्रस्तावित नियतव्यय आणि भौतिक उद्दिष्टे

<table>
<tr><td rowspan="3">अ.क्र. पुस्तिकेतील क्र. योजना क्र.</td><td rowspan="3">विकासक्षेत्र/ उपक्षेत्र/ योजनेचे/ प्रकल्पाचे नाव</td><td colspan="2">२००३-२००४</td><td colspan="2">२००४-२००५</td><td colspan="5">भौतिक उद्दिष्टे/साध्ये</td></tr>
<tr><td rowspan="2">मंजूर नियतव्यय</td><td rowspan="2">अपेक्षित खर्च (रू.लाखात)</td><td rowspan="2">प्रस्तावित नियतव्यय</td><td rowspan="2">त्यापैकी भांडवली खर्च</td><td rowspan="2">बाब</td><td rowspan="2">परिणाम</td><td colspan="2">२००३-२००४</td><td>२००४-२००५</td></tr>
<tr><td>उद्दिष्टे</td><td>साध्ये</td><td>प्रस्तावित उद्दिष्टे</td></tr>
<tr><td>१</td><td>२</td><td>३</td><td>४</td><td>५</td><td>६</td><td>७</td><td>८</td><td>९</td><td>१०</td><td>११</td></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>एकूण</td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

टीप :- १) स्तंभ २ मध्ये योजना घेताना त्या २००३-२००४ चे नियोजन विभागाने काढलेल्या पुस्तकातील क्रमानुसार घ्याव्यात. स्तंभ १ मध्ये अनु.क्र.नंतर या पुस्तकातील योजनेचा क्रमांक नमूद करावा. नवीन योजना सुचविल्या असल्यास त्या अशा योजना नंतर दाखवाव्यात. त्यांना पुस्तिकेतील क्रमांक देण्यात येणार नाहीत.

२) स्तंभ ३ ची एकूण २००३-२००४ च्या नियोजन विभागाने काढलेल्या पुस्तिकेत दर्शविल्याप्रमाणे नियतव्ययाची आकडेवारी असावी.

३) स्तंभ ५ ची एकूण जिल्हयाला दिलेल्या सिलिंग इतकी असावी.

## विवरणपत्र-३

## ग्रामीण पाणीपुरवठयासाठी केलेल्या तरतुदीचा तपशील

(रूपये लाखात)

| विकासाचे उपक्षेत्र | एकूण अपूर्ण योजनांची संख्या | दि.३१.३.२००४ रोजी पूर्ण होणा-या योजनांची संख्या | दि.१.४.२००४ रोजी अपूर्ण राहणा-या योजनांची संख्या | २००४-२००५ च्या वार्षिक योजनेत | |
|---|---|---|---|---|---|
| | त्यांची अंदाजित किंमत (उर्वरित) | त्यांची अंदाजित किंमत | त्यांची उर्वरित अंदाजित | अपूर्ण कामांसाठी प्रस्तावित नियतव्यय | उपक्षेत्रासाठी प्रस्तावित एकूण नियतव्यय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. ग्रामीण पाणीपुरवठा | | | | | |

**विवरणपत्र-४**

**२००४-२००५ च्या प्रस्तावित बांधकामाचा कार्यक्रम**
**ग्रामीण पाणीपुरवठा व बांधकामे**

(रुपये लाखात)

| अ.क्र. | कामाचे नाव | एकूण अंदाजित किंमत (अलिकडील सुधारित) | मार्च, २००३ पर्यंतचा खर्च | २००३-२००४ करिता तरतूद | उर्वरित किंमत (स्तंभ ३-४+५) | २००४-२००५ करिता प्रस्तावित तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

टिपः- १) जिल्हा योजनेच्या उपक्षेत्रातील बांधकामाची माहिती द्यावी.
२) चालू कामे तसेच २००४-२००५ मधील प्रस्तावित कामे नमूद करावीत.

## विवरणपत्र-५

## जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित येणा-या बाह्य सहाय्यित प्रकल्पांसाठी लागणारा नियतव्यय.

(रूपये लाखात)

| अ.क्र. | बाह्य सहाय्यित प्रकल्पाचे नाव | प्रकल्पाची मुदत | प्रकल्पाची एकूण अंदाजित किंमत (अलिकडील सुधारित) | एकूण मंजूर विदेशी अर्थसहाय्य | २००२-२००३ पर्यंत झालेला एकूण खर्च | २००३-२००४ मध्ये अपेक्षित खर्च | प्रकल्पाची उर्वरित अंदाजित किंमत (स्तंभ ४-६+७) | सन २००४-२००५ साठी प्रस्तावित नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |

## विवरणपत्र-६
## जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित येणा-या केंद्र शासन पुरस्कृत योजनांसाठी लागणारा नियतव्यय.

(रूपये लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नाव व केंद्र व राज्य यांच्यामध्ये खर्चाच्या हिश्श्याचे प्रमाण | २००२-२००३ मध्ये झालेले खर्च | | | २००३-२००४ मधील मंजूर | | | २००४-२००५ साठी प्रस्तावित नियतव्यय | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| | | | | | | | | | | |
| | एकूण | | | | | | | | | |

**टीप :** १) स्तंभ २ मध्ये जिल्हा योजनेतील सर्व उपक्षेत्रातील योजना घ्याव्यात.
२) राज्य हिस्सा म्हणजे जिल्हयाच्या योजनेतील मंजूर २००३-२००४ बाबत प्रस्तावित २००४-२००५ साठी नियतव्यय दर्शवावा.
३) केंद्र हिस्सा नियतव्यय योजनेच्या खर्चाच्या प्रमाणानुसार दर्शवावा. २००२-२००३ केंद्र हिश्श्याचा प्रत्यक्ष खर्च दर्शवावा.

## विवरणपत्र-७

## जिल्हा वार्षिक विशेष घटक योजना २००३-२००४ विकासगट निहाय (तालुकानिहाय) मंजूर नियतव्यय व २००४-२००५ चा प्रस्तावित नियतव्यय

जिल्हा :

विकासक्षेत्र :

उपक्षेत्र : ( रूपये लाखात )

| अ.क्र. | तालुका किंवा विकास गट | २००३-२००४ चा मंजूर/ २००४-२००५ चा प्रस्तावित नियतव्यय | मंजूर नियतव्यय २००३-२००४/ प्रस्तावित नियतव्यय २००४-२००५ | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | सर्वसाधारण | वि.घ.योजना | आदिवासी | ओटीएस | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | | २००३-२००४ | | | | | |
| | | २००४-२००५ | | | | | |
| २ | | २००३-२००४ | | | | | |
| | | २००४-२००५ | | | | | |
| ३ | | २००३-२००४ | | | | | |
| | | २००४-२००५ | | | | | |
| ४ | | २००३-२००४ | | | | | |
| | | २००४-२००५ | | | | | |
| ५ | | २००३-२००४ | | | | | |
| | | २००४-२००५ | | | | | |
| इत्यादि | | | | | | | |

**टीप :** १) जिल्हा योजनेच्या एकूण १ ते ८ विकासगटाचे (विकासक्षेत्रांचे) एकूण ३९ उपक्षेत्रे आहेत. प्रत्येक उपक्षेत्रासाठी वरीलप्रमाणे स्वतंत्र प्रपत्र वापरावे व प्रस्तावासोबत माहिती पाठवावी.

२) योजनावार माहिती जिल्हयाकडे तयार ठेवावी.

३) २००३-२००४ चा मंजूर नियतव्यय नियोजन विभागाने काढलेल्या पुस्तिकेत दर्शविला आहे. त्याची विगत तालुकानिहाय असावी.

४) २००४-२००५ चा प्रस्तावित नियतव्यय जिल्हयाने वार्षिक योजनेत जिल्हयाला दिलेल्या सिलिंगमध्ये प्रस्तावित केला असेल त्या नियतव्ययाची विगत तालुकानिहाय द्यावी.

५) वार्षिक योजनेचे प्रारूप तयार झाल्यानंतर एकूण नियतव्यय तालुक्या-तालुक्यात कशा प्रकारे विभागला गेला आहे याबाबतची माहिती आवश्यक आहे. त्यासाठी आवश्यक ती माहिती जिल्हास्तरीय अधिका-यांकडून वार्षिक योजनेचे प्रस्ताव घेताना किंवा प्रारूप अंतिम टप्प्यात असतानाच मिळवावी.

**विवरणपत्र-८**

**मा.वि.स.स. / लोकसभा सदस्य / वि.प.स. / राज्य सभा सदस्य यांच्याकडून २००४-२००५ साठी प्राप्त झालेल्या सूचना / प्रस्ताव.**

( रुपये लाखात)

| अ.क. | मा. सदस्याचे नांव व पत्राचा दिनांक | सुचविलेली कामे | सुचविलेली कामे जिल्हा वार्षिक योजनेत घेण्यासंदर्भात करण्यात आलेली कार्यवाही | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | |

**विवरणपत्र - ९**

**विदर्भ, मराठवाडा व कोकण या विभागांच्या जलद विकासासाठी कालबध्द कार्यक्रमांसाठी प्रस्तावित केलेला नियतव्यय**

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | कार्यक्रमाचे नांव | २००२-२००३ | | २००३-२००४ | | २००४-२००५ |
|---|---|---|---|---|---|---|
| | | नियतव्यय | खर्च | नियतव्यय | खर्च | प्रस्तावित नियतव्यय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |